सन २००९-१० मध्ये विशेष केंद्रीय सहाय्य अंतर्गत केंद्र शासनाने मंजूर केलेला निधी खर्च करण्याबाबत

**महाराष्ट्र शासन**
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रं. केंद्रीय २००९/ प्रक्र ३३ / का १७
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक १० फेब्रुवारी २०१०

वाचा : १) शासन पत्र आदिवासी विकास क्र एससीए-२००९ / प्रक्र ३३/ का १७ दि.९.१०.२००९
२) भारत शासन जनजातीय कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र १४०२०/१ (१३)/२००९ - एसजी - २ दि. ७ डिसेंबर २००९
३) भारत शासन जनजातीय कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांचे पत्र क्र १४०२०/१ (१३)/२००९ - एसजी - २ दि. १८ डिसेंबर २००९

प्रस्तावना :- राज्य शासनाच्या दिनांक ९ ऑक्टोबर २००९ च्या प्रस्तावास अनुसरुन भारत सरकार, जनजातीय कार्य मंत्रालय, नवी दिल्ली यांनी त्यांच्या दिनांक १८/१२/२००९ च्या पत्रान्वये विशेष केंद्रीय सहाय्य योजनेखाली आदिवासी उपयोजना २००९-२०१० साठी रुपये ५१.५५२२ कोटी एवढया अनुदानास मंजूरी दिली असून त्यापैकी पहिला हप्ता म्हणून रुपये ८.९५९१ कोटी एवढी रक्कम वितरीत केली आहे. सदर योजनेसाठी सन २००९-१० मध्ये रुपये ६५.५५ कोटी एवढी तरतूद अर्थसंकल्पीत केली आहे. त्यातून सन २००८-०९ मध्ये शिल्लक राहिलेले रुपये ७६३.४४ लक्ष अनुदान सन २००९-१० च्या तरतुदीतून स्वतंत्र शासन निर्णयाद्वारे आहरित करण्याचे आदेश निर्गमित करण्यात येत आहेत. त्याचबरोबर सन २००९-१० चा पहिला रुपये ८.९५९१ कोटी रक्कमेचा हप्ता प्राप्त झाल्याने त्यापैकी रुपये ६५०.४४ लक्ष रक्कमेच्या योजनांना सध्या रक्कम उपलब्ध करुन देण्याचा निर्णय घेण्यात आला आहे. उर्वरित २४५.४७ लक्ष रक्कमेबाबत मागाहून आदेश वितरीत होतील.

**<u>शासन निर्णय :</u>** शासन आता या निर्णयाद्वारे विशेष केंद्रीय सहाय्य योजनेंतर्गत खाली दर्शविल्याप्रमाणे योजनासाठी रुपये ६५०.४४ लक्ष ( रुपये सहा कोटी पन्नास लक्ष चव्वेचाळीस हजार फक्त ) एवढा निधी आहरित करण्यास आयुक्त, आदिवासी विकास , महाराष्ट्र राज्य नाशिक यांना मंजुरी देत आहे.

(रुपये लाखात )

| अ.क्र | योजना | आहरित करावयाचा निधी |
|---|---|---|
| 1 | Supply of vegetable Seeds & inputs (Rs 250 /- for seeds Rs 150/- for equipment & Rs 100/-for fertilizers & pestricides etc.) kit to tribal women for kitchen gardren. | 200 |
| 2 | Digging of individula tubewell for small irrigation (digging work. pipe line . electric motor, electrification. labour charges, etc. | 100 |
| 3 | Providing Sprinkler Irrigation Set to Tribal Farmers ( Rs 20,000/- per hector per farmer. | 30 |
| 4 | Providing Drip Irrigation set to Tribal Farmers (Rs 30,200/- per hector per farmer. | 45.3 |
| 5 | Erection of Solar Fencing to protect per crops from wild asnimals. | 175.14 |
| 6 | Cultivation of kartoli vegetable and medicinal plant for economic upliftment of tribals with one acre land. | 100 |
| | Total :- | 650.44 |

२. वरील योजनापैकी ज्या योजनांच्या अंमलबजावणीचा तपशील उपलब्ध आहे तो सोबत जोडण्यात आला आहे. उर्वरित योजनांचा तपशील आयुक्त आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांनी त्वरीत शासनास सादर करावा. ज्या योगे त्यास मंजुरी देता येईल.

३. प्रकरणाधीन रक्कम मागणी क्रमांक टी-५ मुख्यलेखाशिर्ष : २२२५ - अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती व इतर मागासवर्गीयांचे कल्याण - पंचवार्षिक योजनांतर्गत योजना - ०२- अनुसूचित जमातीचे कल्याण - ७९६-- जनजाती क्षेत्र उपयोजना- (०१)- जनजाती क्षेत्र

उपयोजनांतर्गत योजना - विशेष केंद्रीय सहाय्य योजना (०१) (४१) केंद्रीय सहाय्याची एकात्मिक योजना (२२२५ ३५५६ ) ३१. सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर ) या अर्थशिर्षाखाली सन २००९-१० च्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून आहरित करण्यात यावी .

४. हा शासन निर्णय राज्य शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००२१०१६५४१६००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

(र. प्र. आटे)
अवर सचिव

प्रति.

आयुक्त, आदिवासी विकास , महाराष्ट्र राज्य, नाशिक (५ प्रती )
आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
अवर सचिव, भारत सरकार , जनजातीय कार्य मंत्रालय, शास्त्री भवन, नवी दिल्ली.
सर्व अपर आयुक्त , आदिवासी विकास , (प्रत्येकी २ प्रती )
सर्व प्रकल्प अधिकारी , एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प
महालेखापाल (लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / २ मुबई / नागपूर -२
महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता ) १ / २ मुंबई / नागपूर -२
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. मंत्री , आदिवासी विकास विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. राज्यमंत्री , आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई - ३२
मा. प्रधान सचिव,आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई - ३२
सह सचिव , आदिवासी विकास विभाग, यांचे स्वीय सहायक , मंत्रालय, मुंबई - ३२
कक्ष अधिकारी (का-७,९,१३,१४) आदिवासी विकास विभाग , मंत्रालय, मुंबई - ३२
संगणक समन्वयक, आदिवासी विकास विभाग (का ६) मंत्रालय, मुंबई - ३२
निवड नस्ती (का १७ ) आदिवासी विकास विभाग , मंत्रालय, मुंबई - ३२